राज्यात सेवा हमी अधिनियम लागू करण्याबाबत समिती गठित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.७४/१८ (र. व का.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ११ नोव्हेंबर २०१४

दिनांक ३१.१०.२०१४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत राज्यात सेवा हमी अधिनियम लागू करण्याकरिता मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली एक वरिष्ठ सचिवांची समिती गठीत करण्यात येईल, असा निर्णय घेण्यात आला आहे.सदर समिती त्याचा सर्वांगीण अभ्यास करुन शासनास एका महिन्यात अहवाल सादर करील. सदर अहवाल विचारात घेऊन राज्यात सेवा हमी अधिनियम लागू करण्याकरिता विधेयक तयार करण्यात येईल, असा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यात सेवा हमी अधिनियम लागू करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | श्री. स्वा. शि. क्षत्रिय, मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | डॉ.पी.एस. मीना, अपर मुख्य सचिव (प्र.सु. र. व का.), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ३ | श्री. के. पी. बक्षी, अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ४ | श्री.सुधीर श्रीवास्तव, अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग | सदस्य |
| ५ | डॉ. भगवान सहाय, प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ६ | श्री. एस.एस.संधु, प्रधान सचिव(महसूल),महसूल व वन विभाग | सदस्य |
| ७ | श्री. व्ही. गिरीराज, प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ८ | श्री. श्रीकांत सिंह, प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग | सदस्य |
| ९ | श्री.सुनील पोरवाल, प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सदस्य |

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १० | श्री. राजेश अग्रवाल, प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ११ | श्री. राधेश्याम मोपलवार, विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई | सदस्य |
| १२ | श्री. श्रीकर परदेशी, महानिरीक्षक, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक शुल्क | सदस्य |
| १३ | श्री. स. मा. साबळे, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा सर्वसाधारणपणे अशी राहील.

I. राज्यात सेवा हमी अधिनियम लागू करण्याच्या दृष्टीने इतर राज्यातील सेवा हमी अधिनियमातील तरतूदीं यांचे अध्ययन करुन राज्यात लागू करावयाच्या सेवा हमी अधिनियमाचा मसूदा सादर करील.

II. प्रशासनीक व वित्तीय अधिकारांचे विकेंद्रीकरण तसेच अधिकाराचे विकेंद्रीकरण व अधिकार सोपविण्याच्या दृष्टीने विचार करील.

III. कार्यपध्दतीचे सुलभीकरण करणे तसेच कार्यालयात वापरण्यात येणारे अर्ज सुलभ / सोपे करणे.

IV. विविध प्रयोजनार्थ प्रतिज्ञापत्र व साक्षांकनाऐवजी स्व-घोषणापत्र (Self-declaration) व स्व-प्रमाणीकरण (Self-Certification) चा विचार करील.

V. कालबाहय झालेले कायदे / अधिनियम / नियम निरसित करण्याबाबत सूचना करील.

VI. प्रशासकीय सुधारणेअंतर्गत सद्य:स्थितीत लागणारे निरनिराळे परवाने / परवानग्या यांच्या आवश्यकतेबाबत पुर्नविचार करणे.

VII. यापूर्वी तत्कालीन राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) यांच्या अध्यक्षतेखाली समिती नियुक्त केली होती. सदर समितीने ३ बैठका घेऊन सदस्य सचिवांना अहवाल तयार करण्यास सांगितले होते. सदर समितीच्या बैठकांचे इतिवृत्त व तयार केलेला प्रस्तावित अहवाल देखील उक्त समितीने विचारात घ्यावा.

सदर समितीने त्यांचा अहवाल सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्यात शासनास सादर करावा.

सदर समितीमध्ये दोन अशासकीय सदस्यांची नियुक्ती नंतर करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११११०४२०२९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prem Singh Meena

Digitally signed by Prem Singh Meena
DN: c=IN, o=all india services, ou=IAS, postalCode=110003, st=New Delhi, cn=Prem Singh Meena
Date: 2014.11.11 10:50:57 +05'30'

**(डॉ. पी.एस. मीना)**
अपर मुख्य सचिव (प्र.सु. र. व का.)

प्रत,

१) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपालांचे सचिव
४) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,
६) शासनाचे मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,
७) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय मुंबई
९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१०) निवड नस्ती (कार्यासन १८)